**राज्यातील रद्द / व्यपगत झालेल्या ऑटोरिक्षा परवान्यांचे नुतनीकरण करणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीआर ०८१५/प्र.क्र.३८७/परि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २३ ऑक्टोबर, २०१५.

**वाचा :- शासन निर्णय क्रमांक - एमव्हीआर ०८१५/प्र.क्र.३८७/परि-२,दि. ०१.१०.२०१५.**

**शासन निर्णय:-**

राज्यातील रद्द / व्यपगत झालेल्या ऑटोरिक्षा परवान्यांचे नुतनीकरण करण्यासाठी एकवेळची संधी म्हणून मोटार वाहन अधिनियम १९८८ च्या कलम-८६ नुसार विविध परिवहन प्राधिकरणांनी उशिरा योग्यता प्रमाणपत्र नुतनीकरणासाठी लागू केलेल्या सहमत शुल्काची कमाल मर्यादा दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१५ पर्यंत मुंबई महानगर क्षेत्रामध्ये रु.२०,०००/- आणि इतर क्षेत्रामध्ये रु. १५,०००/- याप्रमाणे लागू करण्याबाबतचे आदेश संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दिलेले आहेत. सदर कालमर्यादेमध्ये सुधारणा करण्यात येत असून दिनांक १६ नोव्हेंबर, २०१५ पर्यंत उशिरा योग्यता प्रमाणपत्रासाठी कमाल मर्यादेमध्ये सहमत शुल्क घेऊन ऑटोरिक्षा परवान्यांचे नुतनीकरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५१०२३१३३०४२५५२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikamdas N Shikharame
Digitally signed by Tikamdas N Shikharame
DN: CN = Tikamdas N Shikharame, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.10.23 14:43:59 +05'30'

**( टि. न. शिखरामे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अध्यक्ष, परिवहन प्राधिकरण (सर्व)
सर्व जिल्हाधिकारी
सर्व पोलीस आयुक्त
सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
सदस्य, परिवहन प्राधिकरण (सर्व)
सदस्य सचिव, परिवहन प्राधिकरण (सर्व)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (दोन प्रती प्रसिध्दीकरिता)
प्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
निवडनस्ती (परि-२)